**महाराष्ट्र राज्य संस्कृत साहित्य अकादमी,**
**महाराष्ट्र राज्य तेलुगू साहित्य अकादमी,**
**महाराष्ट्र राज्य बंगाली साहित्य अकादमी**
**आणि महाराष्ट्र राज्य गोर बंजारा साहित्य**
**अकादमीची स्थापना करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-८२२३/ प्र.क्र. ११९/सां .का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक : १६ मार्च, २०२४

**वाचा :-** १. सहसंचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी यांचे दिनांक ६ फेब्रुवारी, २०२३ रोजीचे पत्र.
२. सहसंचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी यांचे दिनांक ११ ऑगस्ट, २०२३ रोजीचे पत्र.
३. मा.मंत्रिमंडळाची दिनांक १६ मार्च, २०२४ रोजीची बैठक.

**प्रस्तावना: -**

महाराष्ट्राची राजभाषा असलेल्या मराठी भाषेला अधिक समृध्द करण्यासाठी विविध स्तरांवरुन प्रयत्न केले जातात. बहुभाषिकांच्या या महाराष्ट्रात इतर भाषेतील साहित्यकृतींची भर पडावी या उद्देशाने इतर भाषेंच्या साहित्य अकादमीची स्थापना हे एक महत्त्वपूर्ण पाऊल आहे. महाराष्ट्रात सन १९८२ साली हिंदी साहित्य अकादमी, सन १९८३ साली सिंधी साहित्य अकादमी व सन १९९६ साली गुजराती साहित्य अकादमी या तीन साहित्य अकादमींची स्थापना करण्यात आली आहे. तसेच, राज्यामध्ये तेलुगू आणि बंगाली भाषिकांचे वास्तव्यही असून त्यांच्याकडून तेलुगू आणि बंगाली साहित्य अकादमीची स्थापना करण्याची सातत्याने मागणी होत आहे. तद्वत: गोर बंजारा भाषिकांची देखील मोठी लोकसंख्या राज्यामध्ये आहे. त्यांच्याकडून देखील स्वतंत्र अकादमीची मागणी होत होती. याशिवाय मा.मुख्यमंत्री व मा.उपमुख्यमंत्री यांनी पोहरादेवी येथे गोर बंजारा समाजासाठी स्वतंत्र साहित्य अकादमी स्थापन करण्यात येईल अशी घोषणा केली होती. या तीनही भाषांचे साहित्यिक संपन्नता व ऐतिहासिक महत्त्व लक्षात घेता महाराष्ट्र राज्य तेलुगू साहित्य अकादमी, महाराष्ट्र राज्य बंगाली साहित्य अकादमी आणि महाराष्ट्र राज्य गोर बंजारा साहित्य अकादमीची स्थापना होणे आवश्यक आहे.

याबरोबरच संस्कृत ही मराठी भाषेची जननी आहे आणि महत्त्वाचा सांस्कृतिक वारसा संस्कृत भाषेतही उपलब्ध असल्याने संस्कृत भाषेचे जतन, संवर्धन, प्रचार-प्रसार मोठ्या प्रमाणावर व्हावा, याकरीता महाराष्ट्र राज्य संस्कृत साहित्य अकादमी स्थापन होणे आवश्यक आहे. यासाठी दिनांक १६ मार्च, २०२४ रोजीच्या मा.मंत्रिमंडळ बैठकीमध्ये या चारही अकादमी स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

साहित्यिक / भाषिक आदान - प्रदानातून राज्याचा सांस्कृतिक विकास साधून राष्ट्रीय एकात्मता वाढीस लागावी या हेतूने महाराष्ट्र राज्य संस्कृत साहित्य अकादमी, महाराष्ट्र राज्य तेलुगू साहित्य अकादमी, महाराष्ट्र राज्य बंगाली साहित्य अकादमी आणि महाराष्ट्र राज्य गोर बंजारा साहित्य अकादमी यांची स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य संस्कृत साहित्य अकादमी, महाराष्ट्र राज्य तेलुगू साहित्य अकादमी, महाराष्ट्र राज्य बंगाली साहित्य अकादमी आणि महाराष्ट्र राज्य गोर बंजारा साहित्य अकादमी यांची स्थापना करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**०२. साहित्य अकादमींची रचना :-**

**अकादमीची रचना :-**

| अ.क्र. | नाव/ हुद्दा | पद |
|---|---|---|
| १ | मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव सांस्कृतिक कार्य | शासकीय सदस्य |
| ३ | सह सचिव/ उप सचिव, सांस्कृतिक कार्य | शासकीय सदस्य |
| ४ | संचालक/सहसंचालक | सदस्य सचिव |
| **अशासकीय सदस्य** – समितीचे अध्यक्ष या नात्याने अशासकीय सदस्यांची नेमणूक करण्याचे अधिकार मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांना असतील.<br>समितीमध्ये १ कार्याध्यक्ष आणि इतर १० अशासकीय सदस्य असे एकूण ११ अशासकीय सदस्य असतील. या सदस्यांपैकी किमान ३०% सदस्य मराठी साहित्य क्षेत्रातील असतील. तसेच सदर मर्यादा अस्तित्वातील अकादमींसाठीही विद्यमान सदस्यांचा कार्यकाल पूर्ण झाल्यानंतर लागू राहील. | | |

**कार्यकारी समिती :-**

| अ.क्र. | नाव/ हुद्दा | पद |
|---|---|---|
| १ | कार्याध्यक्ष | अध्यक्ष |
| २ | समितीतील अशासकीय सदस्य | सदस्य |
| ३ | संचालक/सहसंचालक | सदस्य सचिव |

**कार्यकारी समितीची कार्यकक्षा :-**

अकादमीच्या विविध योजना, पुरस्कार, कार्यक्रम रुपरेषा ठरविणे, साहित्यिक अदान-प्रदान बाबत उपाययोजना, अनुदान वाटपाबाबत कार्यवाही इत्यादी यांची अंमलबजावणीसंबंधी निर्णय कार्याध्यक्षांच्या अध्यक्षतेखालील कार्यकारी समितीव्दारे घेण्यात येतील.

**मानधन व भत्ते :-**

प्रत्येक अकादमीच्या कार्याध्यक्षांना दरमहा रु. ५,०००/- मानधन देय राहील. तसेच, कार्याध्यक्ष व इतर अशासकीय सदस्यांना वित्त विभागाच्या शासन निर्णयानुसार प्रवास भत्ता, दैनिक भत्ता व बैठक भत्ता अनुज्ञेय राहील.

**कार्यकाल :-**

अशासकीय सदस्यांच्या नियुक्तीचा कालावधी नियुक्तीपासून सर्वसाधारणपणे ३ वर्षे राहील. तथापि, त्यापुर्वी सदर नियुक्त्या रद्द करण्याचे अधिकार शासनास असतील. अशासकीय सदस्यांच्या नियुक्त्या रद्द झाल्यावरही, शासकीय सदस्य कार्यरत असल्याने अकादमीचे अस्तित्व कायम राहील.

**०३. साहित्य अकादमींची उद्दिष्टे :-**

१. राज्यातील बहुभाषिकांच्या म्हणजेच मराठी भाषिकांच्या संस्कृती, साहित्य, भाषा व लोकजीवनाशी सुसंवाद साधून सांस्कृतिक सुसंवाद निर्माण करण्याची कला या भाषिक अल्पसंख्यांकांना अवगत व्हावी.

२. संस्कृत, तेलुगू, बंगाली व गोर बंजारा भाषा, साहित्य, कला व संस्कृती यांचे जतन व संवर्धन करणे.

३. संस्कृत, तेलुगू, बंगाली व गोर बंजारा भाषा, साहित्य आणि कला क्षेत्रातील व्यक्तींना पुरस्कृत करणे.

४. संस्कृत, तेलुगू, बंगाली व गोर बंजारा भाषेच्या विकास व संवर्धनासाठी प्रोत्साहन देणे.

५. संस्कृत, तेलुगू, बंगाली व गोर बंजारा भाषेतील वाङ्.मयीन कृती प्रकाशित करण्यात सहाय्य करणे.

६. मराठी आणि संस्कृत, तेलुगू, बंगाली व गोर बंजारा या भाषांमध्ये साहित्यिक कल्पनांची देवाणघेवाण करणे.

७. संस्कृत, तेलुगू, बंगाली व गोर बंजारा अशा भाषिक अल्पसंख्याकांनी केवळ त्यांच्या भाषेतील कार्यक्रम आयोजित करुन मर्यादीत सामाजिक सुसंवाद ठेवण्याऐवजी त्यांच्या भाषेतील कार्यक्रमांसोबतच मराठी भाषिक कार्यक्रमांचे आयोजन करुन त्यामध्ये मराठी भाषिकांनाही सहभागी करुन सामाजिक सुसंवाद निर्माण करणे.

८. संस्कृत, तेलुगू, बंगाली व गोर बंजारा या भाषेसोबतच मराठी भाषेतही परीसंवाद, चर्चासत्रे, कविसंमेलने यासारखे साहित्यिक तसेच सांस्कृतिक कार्यक्रम आयोजित करणे.

९. संस्कृत, तेलुगू, बंगाली व गोर बंजारा सोबतच मराठी भाषिकांच्या लोककलांची संमेलने आयोजित करणे.

**०४. साहित्य अकादमींमार्फत अंमलबजावणी करावयाच्या योजना:**

महाराष्ट्र राज्य संस्कृत, तेलुगू, बंगाली आणि गोर बंजारा साहित्य अकादमी ही राजभाषा मराठी व संस्कृत, तेलुगू, बंगाली आणि गोर बंजारा या चार भाषांमध्ये भाषांतराद्वारे व अन्य साहित्यिक प्रयत्नाने कल्पनांची देवाण-घेवाण करण्यासाठी, शासन वेळोवेळी निर्धारीत करेल त्या योजना, त्या-त्या योजनांसाठी विहित केलेल्या कमाल खर्च मर्यादेचे

काटेकोर पालन करुन कार्यान्वित करेल. या अकादमीमार्फत अंमलबजावणी करावयाच्या योजना व त्यांची खर्च मर्यादा पुढीलप्रमाणे विहित करण्यात येत आहे.

**(अ) पुरस्कार :-**

**१. <u>जीवन गौरव पुरस्कार</u>-:** संस्कृत, तेलुगू, बंगाली व गोर बंजारा कला, संस्कृती आणि साहित्य क्षेत्रात उत्कृष्ट कार्य करणाऱ्या प्रत्येक भाषेतील एका व्यक्तीस दरवर्षी त्यांच्या योगदानाबद्दल “जीवन गौरव पुरस्कार” प्रदान करुन गौरविण्यात येईल.

**<u>पुरस्काराचे स्वरुप</u> :** प्रत्येकी रु .१.०० लाख, मानचिन्ह, मानपत्र, शाल व श्रीफळ असे या पुरस्काराचे स्वरुप असेल.

**२. <u>साहित्य पुरस्कार</u>:-** संस्कृत, तेलुगू, बंगाली व गोर बंजारा भाषा आणि साहित्याशी संबंधित चार वेगवेगळ्या वाङ्.मय प्रकारातील साहित्यिकांच्या पुस्तकांना पुरस्कार देऊन गौरविण्यात येईल.

**<u>पुरस्काराचे स्वरुप</u> :** प्रत्येकी रु. ५१,०००/-, मानचिन्ह, मानपत्र, शाल व श्रीफळ असे या पुरस्काराचे स्वरुप असेल.

**३. <u>कला पुरस्कार</u>-:** संस्कृत, तेलुगू, बंगाली व गोर बंजारा भाषेतील कला, लोककला इत्यादी क्षेत्रात उत्कृष्ट कार्य करणाऱ्या एका व्यक्तीस दरवर्षी त्यांच्या या क्षेत्रातील योगदानाबद्दल कला पुरस्काराने गौरविण्यात येईल.

**<u>पुरस्काराचे स्वरुप</u> :** प्रत्येकी रु.५१,०००/-, मानचिन्ह, मानपत्र, शाल व श्रीफळ असे या पुरस्काराचे स्वरुप असेल.

**४. <u>नवोदित लेखक/ कवी/ साहित्यिक पुरस्कार</u> :** संस्कृत, तेलुगू, बंगाली व गोर बंजारा भाषा व साहित्य क्षेत्रातील एका नवोदित लेखकास या पुरस्काराने गौरविण्यात येईल.

**<u>पुरस्काराचे स्वरुप</u> :** प्रत्येकी रु.५१,०००/-, मानचिन्ह, मानपत्र, शाल व श्रीफळ असे या पुरस्काराचे स्वरुप असेल.

**५. <u>अनुवाद पुरस्कार :-</u>** साहित्यिक कल्पनांची देवाणघेवाण अंतर्गत मराठीमधून संस्कृत, तेलुगू, बंगाली व गोर बंजारा या भाषांमध्ये अनुवाद करणाऱ्या साहित्यकारांना दरवर्षी या विशेष पुरस्काराने गौरविण्यात येईल.

**<u>पुरस्काराचे स्वरुप</u> :** प्रत्येकी रु .५१,०००/- मानचिन्ह, मानपत्र, शाल व श्रीफळ असे या पुरस्काराचे स्वरुप असेल.

**(ब) अनुदान :-**

**१. <u>पुस्तकांच्या प्रकाशनासाठी अनुदान</u>:-** या योजनेंतर्गत संस्कृत, तेलुगू, बंगाली व गोर बंजारा भाषेतील पुस्तकांच्या प्रकाशनासाठी प्रत्येकी कमाल रु.२५,०००/- अनुदान देण्यात येईल. यासाठी लेखकांकडून अर्ज मागवून अकादमीच्या समितीमार्फत पुस्तकांची निवड करण्यात येईल. प्रत्येक अकादमीसाठी सदर प्रकाशन संख्या त्या-त्या आर्थिक वर्षातील उपलब्ध निधीच्या अधीन असेल.

२. **अनुवादासाठी प्रोत्साहनात्मक अनुदान:-** या योजनेंतर्गत मराठी व संस्कृत, तेलुगू, बंगाली आणि गोर बंजारा भाषांमध्ये साहित्यिक अदान-प्रदान होण्याच्या दृष्टीने मराठी भाषेतील उत्कृष्ट साहित्यकृतींचा संस्कृत, तेलुगू, बंगाली व गोर बंजारा भाषेत अनुवाद करण्यासाठी प्रती शब्द रुपये २.००/- प्रमाणे प्रोत्साहनात्मक अनुदान देण्यात येईल.

**(क) साहित्यिक आणि सांस्कृतिक कार्यक्रम:-** महाराष्ट्रातील ज्या शहरांमध्ये संस्कृत, तेलुगू, बंगाली व गोर बंजारा भाषिक समुदाय मोठ्या प्रमाणात राहतो, अशा शहरांमध्ये संस्कृत, तेलुगू, बंगाली व गोर बंजारा सोबतच मराठी भाषेतील परीसंवाद, चर्चासत्रे, संगोष्ठी, कार्यशाळा, कविसंमेलने यासारखे साहित्यिक कार्यक्रम तसेच या भाषेंमधील लोकसाहित्य, लोकगीत आणि लोककला यावर आधारीत सांस्कृतिक कार्यक्रमांचे आयोजन करण्यात यावे. यासाठीचा खर्च महाराष्ट्र राज्य संस्कृत साहित्य अकादमी, महाराष्ट्र राज्य तेलुगू साहित्य अकादमी, महाराष्ट्र राज्य बंगाली साहित्य अकादमी आणि महाराष्ट्र राज्य गोर बंजारा साहित्य अकादमी यांना त्या-त्या वर्षी मंजूर होणाऱ्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

०५. हिंदी, सिंधी, गुजराती, संस्कृत, तेलुगू, बंगाली आणि गोर बंजारा या ७ साहित्य अकादमीच्या एकत्रित कार्यालयातील एकूण ५४ पदांच्या निर्मितीसाठी मान्यता देण्यात येत आहे. यासाठीची आवश्यक असलेली कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात यावी.

०६. **खर्चाची बाब:-**

सदर अकादमींची स्थापना सन २०२४-२५ या आर्थिक वर्षापासून करण्यात येत आहे. तरी, प्रथम वर्षाकरीता नव्याने निर्माण करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र राज्य संस्कृत साहित्य अकादमी, महाराष्ट्र राज्य तेलुगू साहित्य अकादमी, महाराष्ट्र राज्य बंगाली साहित्य अकादमी आणि महाराष्ट्र राज्य गोर बंजारा साहित्य अकादमीच्या अनिवार्य स्वरुपाच्या खर्चाकरीता प्रत्येकी रु.३६.६० लक्ष, कार्यक्रम स्वरुपाच्या खर्चाकरीता प्रत्येकी रु.६३.४० लक्ष याप्रमाणे प्रत्येकी रुपये १.०० कोटी इतक्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

सर्व साहित्य अकादमीतील नियमित पदांचे वेतन, बाह्ययंत्रणेमार्फत कार्यरत कर्मचाऱ्यांचे मानधन, दुरध्वनी, विज, पाणी देयके, कार्यालयीन खर्च, संगणक खर्च व इतर अनिवार्य स्वरुपाच्या खर्चासाठी १ नवीन अनिवार्य लेखाशिर्ष तसेच चारही अकादमींस प्रत्येकी एक याप्रमाणे ४ कार्यक्रम लेखाशिर्ष उघडण्याची व आवश्यक तरतूद करण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात यावी.

०७. सदर शासन निर्णयाची अंमलबजावणी दिनांक १ एप्रिल, २०२४ पासून करण्यात येईल.

०८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१६१७५९४६९०२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

BALASAHEB ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2024.03.16 18:08:55 +05'30'

**(बाळासाहेब ईश्वर सावंत)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
६. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२.
७. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान परिषद/विधान सभा/विधानपरिषद/विधानसभा सदस्य, विधानभवन, मुंबई-३२
८. मा. मुख्य सचिव, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
९. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (प्रसिध्दीसाठी)
११. मा. महालेखापाल १/२ (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
१२. संचालक, लेखा व कोषागारे (संगणक कक्ष), नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय, मुंबई
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१४. उप सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५. अवर सचिव (सां.का.४), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६. सहसंचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी,गुजराती साहित्य अकादमी, मुंबई
१७. निवडनस्ती (सां.का.४)